**डॉ.एस.पी.बडगुजर, संचालक, प्रौढ शिक्षण व निरंतर शिक्षण, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगांव यांची, नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई येथील कुलसचिव या पदावर एका वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांकः संकीर्ण २०१३/प्र.क्र.०९/वि.शि.-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: २३ सप्टेंबर, २०१५

**शासन आदेश-**

डॉ.एस.पी.बडगुजर, संचालक, प्रौढ शिक्षण व निरंतर शिक्षण, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगांव यांची कुलसचिव, नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई या पदावर एका वर्षाच्या कालावधीसाठी अथवा कुलगुरुंकडून नवीन कुलसचिवांची यथोचितरित्या नियुक्ती होईपर्यंत, यापैकी जे आधी घडेल तेवढया कालावधीसाठी, प्रतिनियुक्तीने नियुक्ती खालील अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

१) श्री.बडगुजर ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होतील, त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल. त्यानंतर एका वर्षांनी अथवा कुलगुरुंकडून नवीन कुलसचिवांची यथोचितरित्या नियुक्ती होईपर्यंत, यापैकी जे आधी घडेल तेवढया कालावधीनंतर प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सुपूर्द करुन त्यांच्या मूळ कार्यालयात ज्या तारखेला रुजू होतील, त्या तारखेला त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

२) जर त्यांची सेवा त्यांच्या मूळ कार्यालयास आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकारी राखून ठेवतील.

३) जर त्यांची सेवा स्वीयेतर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर, त्यांना मूळ कार्यालयाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेतर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेतर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिका-याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे, आणि

४) त्यांनी मूळ कार्यालयाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिका-याला दिल्यानंतर त्यांना मूळ कार्यालयाकडे परत येण्याची मुभा राहील.

प्रतिनियुक्तीच्या कालावधीत श्री.बडगुजर यांना प्रतिनियुक्ती भत्ता देय असणार नाही. त्यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती दोन्ही विद्यापीठांनी आपापसात सल्लामसलत करुन ठरवाव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९२३१४४३४२८९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Harshwardhan Tukaram Jadhav

Digitally signed by Harshwardhan Tukaram Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Harshwardhan Tukaram Jadhav
Date: 2015.09.23 14:47:11 +05'30'

**( हर्षवर्धन तु. जाधव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. डॉ.एस.पी.बडगुजर, संचालक, प्रौढ व निरंतर शिक्षण, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगांव,

**प्रत,**

१. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
३. कुलसचिव, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगांव,
४. कुलसचिव, नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई